**सन २०२४-२५ करिता कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल (कार्यक्रम) (२४१५-१०६८) योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४३/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०८ मे, २०२४

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. १ एप्रिल, २०२४
२. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष- १/पी/चाबाप्र/प्र.क्र.२७/८४/२०२४-२५, दिनांक ०२.५.२०२४

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल (कार्यक्रम) (२४१५ १०६८) या लेखाशिर्षाअंतर्गत ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) रु.४२८.०० लक्ष व ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) रु.५७५.०० लक्ष असा एकूण रु.१००३.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित आहे.

वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.१ च्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष सन २०२४-२५ करिता अर्थसंकल्पीय तरतूदीची एप्रिल ते जुलै, २०२४ पर्यतची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा निधी (लेखानुदान) अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत.

सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या वाचा येथील क्र.२ च्या पत्रान्वये ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) अंतर्गत रु.३६.३४ लक्ष व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु.४२७.६८ लक्ष असा एकुण रु.४६४.०२ लक्ष रकमेचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झाला असून अनुदान उपलब्ध करुन देण्यास विनंती केली आहे. त्यानुसार सदर प्रस्तावासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील नमुद क्र.२ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे वाचा येथील क्र.१ च्या परिपत्रकानुसार बीम्स प्रणालीवर उपलब्ध निधी विचारात घेता, प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, सन २०२४-२५ करीता महासंचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल येथील कर्मचाऱ्यांचे वेतन व इतर बाबींवरील खर्च भागविण्याकरीता कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल (कार्यक्रम) (२४१५ १०६८) या योजनेमधून ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु.१४२.६६ लक्ष इतका निधी खालील

अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

५. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.

६. सदर आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

७. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

८. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

९. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२,नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी-२०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

१२. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूदी तसेच प्रचलित कायदे व नियम यामधील तरतूदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

उपरोक्त खर्च मागणी क्र.सी-७ प्रधान शिर्ष-२४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०६-वनीकरण, २७७-शिक्षण (००) (०२) कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल (कार्यक्रम) (२४१५-१०६८) या लेखा शिर्षाखाली ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या उपशिर्षात सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४ चे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५०८१२०३४७२०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY
HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179,
pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P,
2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b6
78e, postalCode=414001, st=MAHARASHTRA,
serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a6
7a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.05.08 12:16:16 +05'30'

**( विवेक होशिंग )**
**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. महासंचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. सह सचिव/उपसचिव, वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
८. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवडनस्ती.